**आंतरराष्ट्रीय कृषि विकास निधी (आयफॅड) सहाय्यित तेजस्विनी महाराष्ट्र ग्रामीण महिला सक्षमीकरण कार्यक्रम राबविण्याकरिता निधी उपलब्ध करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-माविम-२०१७/प्र.क्र.५८/का-१०**
नविन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख-२१ जून, २०१७.

**वाचा :-**

१. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्रमांक- माविम-२००२/प्र.क्र.१०६/ का-१०, दिनांक ५ फेब्रुवारी, २००७.
२. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि.१८ एप्रिल, २०१७.

**प्रस्तावना :-**

आंतरराष्ट्रीय कृषि विकास निधी (आयफॅड) सहाय्यित तेजस्विनी महाराष्ट्र ग्रामीण महिला सक्षमीकरण कार्यक्रम राबविण्यास शासन निर्णय क्रमांक- माविम-२००२/ प्र.क्र.१०६/ का-१०, दिनांक ५ फेब्रुवारी, २००७ अन्वये मान्यता दिलेली आहे. सदरचा कार्यक्रम राबविण्याबाबत केंद्र शासन, महाराष्ट्र शासन व आंतरराष्ट्रीय कृषि विकास निधी यांच्यामध्ये दिनांक १२.१०.२००६ रोजी करार झाला आहे.

२. सन २०१६- १७ या आर्थिक वर्षात महिला आर्थिक विकास महामंडळाला तेजस्विनी महाराष्ट्र ग्रामीण महिला सक्षमीकरण कार्यक्रम योजनेंतर्गत २२३५-३२१२ या लेखाशिर्षाखाली एकूण ₹६४,००,०००/- (अक्षरी रुपये चौसष्ट लक्ष फक्त) इतका निधी प्राप्त झाला होता. सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र माविमने शासनास सादर केले आहे. सन २०१७-१८ या वित्तीय वर्षासाठी २२३५-३२१२ या लेखाशिर्षाखाली एकूण ₹२२,००,०००/- (अक्षरी रुपये बावीस लक्ष फक्त) इतकी तरतूद मंजूर आहे. यापैकी ८०% ₹१७,६०,०००/- (अक्षरी रुपये सतरा लक्ष साठ हजार फक्त) इतकी तरतूद माविमला वितरित करणेबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यावर शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

आंतरराष्ट्रीय कृषि विकास निधी (आयफॅड) सहाय्यित तेजस्विनी महाराष्ट्र ग्रामीण महिला सक्षमीकरण कार्यक्रम राबविण्याकरिता राज्य शासनाचा समभाग सामाजिक न्याय विभागामार्फत विशेष घटक योजने अंतर्गत उपलब्ध करुन द्यावयाच्या निधीमधून २२३५-३२१२ या लेखाशिर्षाखाली ८० टक्के मर्यादेतील **₹१७,६०,०००/- (अक्षरी रुपये सतरा लक्ष साठ हजार फक्त)** इतका निधी माविमला वितरित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. याकरीता जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी हा निधी महिला आर्थिक विकास महामंडळास वितरित करावा व माविमने सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे व शासनास सादर करावे.

३. मुक्त करण्यात आलेले अनुदान जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर यांच्या सहीने तयार केलेले व उपसचिव, महिला व बाल विकास यांनी प्रतिस्वाक्षरी केलेले देयक अधिदान व लेखा अधिकारी यांना सादर करावे. अधिदान व लेखा अधिकारी यांनी सदर देयकातील मंजूर रक्कम धनादेशाद्वारे अदा करावी. उपसचिव, महिला व बाल विकास यांना जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर यांनी सादर केलेल्या देयकावर प्रतिस्वाक्षरी करण्याचे अधिकार दिलेले आहेत. सदर निधी हा अनुसूचित जाती व नवबौध्द घटकातील लाभार्थ्यांकरिताच खर्च होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

४. हा खर्च मागणी क्रमांक एक्स-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२, समाजकल्याण, १०३, महिला कल्याण, (०३) (०७) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ याच्या कलम १८७ अन्वये महिला आर्थिक विकास महामंडळासाठी जिल्हा परिषदांना सहायक अनुदान (महिला सक्षमीकरण) (अ.जा.उ.यो.) (२२३५-३२१२) ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली सन २०१७-१८ या वित्तीय वर्षाकरिता मंजूर असलेल्या तरतुदीतुन भागविण्यात यावा.

५. वित्त विभागाच्या दि.१८.४.२०१६ रोजीच्या परिपत्रकानुसार सदर परिपत्रकामध्ये नमूद तपासणी सूची व परिशिष्ट परिच्छेद क्र.७ ते १८ मधील विभागास लागू होणाऱ्या बाबींची पूर्तता होत असल्याने विभागाच्या स्तरावर सदर निधी वितरित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

६. हा शासन निर्णय वित्त विभाग परिपत्रक क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि.१८ एप्रिल, २०१७ व सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.११७/विघयो, दि.१० जून, २०१७ अन्वये त्या विभागांनी दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०६२११३२२३१८२३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Milind P Shenoy

Digitally signed by Milind P Shenoy
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Womens And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5a1cf9161e18ca8fa3b7a2263c18944e06f156ba19752cad5615c266d0b4ffb8, cn=Milind P Shenoy
Date: 2017.06.22 13:33:05 +05'30'

**(मि.प.शेणॉय)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.

२. व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ (माविम), बांद्रा (पूर्व), मुंबई-५१.

३. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
४. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
७. जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर.
८. कक्ष अधिकारी (विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
९. कक्ष अधिकारी, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.कक्ष अधिकारी, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.सर्व उपसचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.निवड नस्ती, का-१०.